शासकीय आयुर्वेद महाविद्यालय/रुग्णालय व शासकीय आयुर्वेदिक व युनानी रसशाळा, नांदेड या संस्थांकरिता सुरक्षारक्षकांची पदे महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळामार्फत भरणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. आयुष-२०२२/प्र.क्र.९२/२२/आयु-२,**
नवीन गो.ते. रुग्णालय संकुल, ९ या मजला, नविन मंत्रालय, मुंबई ४००००१.
दिनांक: ०६ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दिनांक ०८. ११. २००६

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२. दिनांक १७.०४.२०१५

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क.. दिनांक २७. ०४. २०२२.

४) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२२/प्र.क्र.१००/प्रशा-२, दिनांक ०६. १२. २०२२

५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, संशोधन व आयुष कार्यालयाचे पत्र क्र.आसंमुं/कंत्राटी/पहारेकरी/२०२४/आयु-४(२)/६९३९, दिनांक १८.०६. २०२४.

**प्रस्तावना :-**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय आयुर्वेद महाविद्यालय/रुग्णालय, नांदेड व शासकीय आयुर्वेदिक व युनानी रसशाळा, नांदेड या संस्थांच्या परिसरामध्ये सुरक्षितेच्या दृष्टीने बाह्यस्रोताद्वारे सुरक्षा रक्षक उपलब्ध करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय:-**

शासकीय आयुर्वेद महाविद्यालय, नांदेड व शासकीय आयुर्वेद रुग्णालय, नांदेड तसेच, शासकीय आयुर्वेदिक व युनानी रसशाळा, नांदेड या संस्थेमधील विद्यार्थी, विद्यार्थिनी तसेच संस्थेमधील प्राध्यापक/सहयोगी प्राध्यापक व अन्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या सुरक्षेच्या दृष्टीने ३८ सुरक्षा रक्षक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ मर्या., लातूर यांनी निश्चित केलेल्या दरानुसार एक वर्षासाठी उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरिता

वेतनापोटी येणाऱ्या वार्षिक रु.१,३८,२३,१८४/- (अक्षरी रुपये एक कोटी अडतीस लाख तेवीस हजार एकशे चौऱ्याऐंशी फक्त) एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर सुरक्षा रक्षकांच्या वेतनापोटी येणारा खर्च सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून अदा करण्यात यावा आणि तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा:-

मागणी क्र. एस-१ (अनिवार्य/Committed)

२२१०- वैद्यकीय सेवा सार्वजनिक आरोग्य
०५- वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०१- आयुर्वेद
(०१)- आयुर्वेदीक महाविद्यालये
१०- कंत्राटी सेवा
(०१) (०२)- आयुर्वेदीक महाविद्यालय, नांदेड व शासकीय आयुर्वेद व युनानी रसशाळा, नांदेड (२२१० १९७५)

मागणी क्र. एस-१ (अनिवार्य/Committed)

२२१०- वैद्यकीय सेवा सार्वजनिक आरोग्य
०२- नागरी आरोग्य सेवा व सार्वजनिक आरोग्य
१०१- आयुर्वेद
(०२) (०२)- आयुर्वेदीक मुफसल रुग्णालये व दवाखाने (२२१० १९०१)
१०- कंत्राटी सेवा

३. वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग चार, अनुक्रमांक -११, अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०६११५८४८२५१३ असा आहे. हा आदेश परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN KANDE

Digitally signed by PRAVIN KANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=4ea9fcd268037f50c6f469cafb9e8d571ef53f436a0d3db98579024a64f1966f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4872BFCB63B41B8EF18FECFBF2E9F82DF71E24DCB4AF0F949AE722EA007470A9, cn=PRAVIN KANDE
Date: 2024.08.06 17:30:02 +05'30'

( प्रविण कांदे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) महालेखापाल-२, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन व आयुष, मुंबई.

३) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.

४) अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालय/रुग्णालय, नांदेड

५) अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेदिक व युनानी रसशाळी, नांदेड

६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.

७) निवड नस्ती (आयु-२)